राज्य ई-गव्हर्नन्स कार्यक्रमांतर्गत सचिव (पदुम) यांच्या बैठक दालनात Video Conferencing ची यंत्रणा खरेदी करण्याकरीता रु. ९८,३९३ /- निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र. ईगव्ह-०४२३/प्र.क्र.८१/१४-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय मुंबई-४०० ०३२
दिनांक - २८ मार्च, २०२४

**संदर्भ :-** १) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२ एप्रिल, २०२३.

२) कृषि व पदुम विभागाचे पत्र क्र.ईगव्ह-११२३/प्र.क्र.२३८/१४-अे, दि. १२ जानेवारी,२०२४ (दि. ०३ जानेवारी, २०२४ रोजी पार पडलेल्या PIC बैठकीचे इतिवृत्त.)

३) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. ईगव्ह-०४२३/प्र.क्र.८१/१४-अे, दि. ०५ फेब्रुवारी, २०२४

४) कृषि व पदुम विभागाचे पत्र क्र.ईगव्ह-११२३/प्र.क्र.२३८/१४-अे, दि. २० मार्च,२०२४ (दि. १४ मार्च, २०२४ रोजी पार पडलेल्या PIC बैठकीचे इतिवृत्त.)

**प्रस्तावना :-**

कृषि व पदुम विभागाचे (खुद्द), मंत्रालयाचे संगणकीयदृष्ट्या बळकटीकरण व्हावे यासाठी राज्य ई-गव्हर्नन्स कार्यक्रम ही योजना राबविण्यात येते. सदर योजनेंतर्गत सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरिता एकूण रुपये २५.०० कोटी निधी अर्थसंकल्पित केलेला आहे.

सचिव (पदुम) यांच्या बैठक दालनात Video Conferencing ची यंत्रणा खरेदी करण्याकरीता संदर्भ क्र. २ येथील PIC बैठकीतील निर्णयानुसार दि. ०५ फेब्रुवारी, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु. ६ लक्ष निधी कृषि विभाग (खुद्द) यांना वितरीत करण्यात आला आहे. तथापि, सदर यंत्रणेची प्रत्यक्ष खरेदी किंमत रु. ९,५०,०५३.१५ /- इतकी असल्यामुळे आवश्यक अतिरिक्त निधीपैकी रु. २,५१,६६०/- इतका निधी विभागाच्या संगणक खरेदीतून बचत झालेला/शिल्लक राहिलेल्या निधीतून उपलब्ध करुन देण्यात आलेला असून उर्वरित रु. ९८,३९३ /- निधी राज्य ई-गव्हर्नन्स योजनेतून उपलब्ध करुन देण्यास संदर्भ क्र.४ येथील PIC बैठकीत मान्यता देण्यात आलेली आहे.

प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार (संदर्भ क्र.४) सचिव (पदुम) यांच्या बैठक दालनात Video Conferencing ची यंत्रणा खरेदी करण्याकरीता आवश्यक रकमेपैकी उर्वरित रु. ९८,३९३ राज्य ई-गव्हर्नन्स कार्यक्रमांतर्गत मंजूर निधीमधून अदा करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१. सन २०२३-२४ या वित्तीय वर्षामध्ये ई-गव्हर्नन्स योजनेंतर्गत मंजूर निधीमधून कृषि व पदुम विभाग (खुद्द) करीता सचिव (पदुम) यांच्या बैठक दालनात Video Conferencing ची यंत्रणा खरेदी करण्याकरीता रु. ९८,३९३ (रु.अठ्ठयाण्णव हजार तीनशे त्र्याण्णव फक्त) अदा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये कृषि विभागांतर्गत ई-गव्हर्नन्स कार्यक्रमाकरिता रु. ९८,३९३ (रु.अठ्ठयाण्णव हजार तीनशे त्र्याण्णव फक्त) निधी वितरीत करण्यात आला असून तो पुढील लेखाशिर्षांतर्गत सन २०२३-२४ करिता अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतुदीतुन खर्ची टाकावा :-

**"मागणी क्र.डी-७**
**३४५१ सचिवालय- आर्थिक सेवा,**
**पंचवार्षिक योजनांतर्गत योजना**
**(०२) योजना**
**(०२) (०४) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम अंमलबजावणी**
**(कृषि) (३४५१ २७८२),१७ संगणक खर्च**

३. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला रु. ९८,३९३ /- निधी कोषागारातून आहरण व वितरणासाठी अवर सचिव, रोख शाखा, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व उप सचिव (रोख शाखा), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक दि.०४ मार्च,२०२४ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२८१४३४४१५९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यापाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHENDRA SOPAN GHADGE

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=9847eac29efa7aa62661b16d1619a1bfaf6d99b23ec6836d8d498d0797965898, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=761BD1B7183B95814545ACE2DBF80778C68C7EE4EF46BAA6EA9B8BD1F47C2642, cn=MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2024.03.28 14:50:30 +05'30'

**( महेंद्र सो. घाडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई

३. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , मुंबई/नागपुर
६. प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र , मुंबई/नागपुर
७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई/अधिदान व लेखा कार्यालय मुंबई,
८. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मुंबई,
९. निवडनस्ती (१४-अे).
१०.वित्त विभाग (कार्या. व्यय-१४ / अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
११.निवड नस्ती.